मराठवाडा साहित्य परिषद पुरस्कृत प्रकाशन

# साद



कवि–राम पिंगळीकर

प्रस्तावना–डॉ ना. गो. नांदापूरकर

एम्.ए. पीएच्. डी.

## प्रकाशकाचें निवेदन :–

प्रकाशन, प्रचार आणि प्रोत्साहन याची जोड न मिळाली तर साहित्य-निर्मिति जागच्या जागीच विरते याचा अनुभव नाही कुणाला? हैदराबाद राज्यातील मराठी भाषिकानी दीर्घ कालपर्यंत हा कटु अनुभव घेतला आहे हैदराबाद राज्यातील मराठी भाषिकाचे मागसले वाङ्मयीन जीवन याच परिस्थितीचा परिपाक आहे

ही परिस्थिति दूर करण्यासाठी साहित्य-प्रकाशनाचे कार्य मराठवाडा साहित्य परिषदेने नेटाने हाती घेतले आहे. अल्पावधीत निघालेली बरीचशी प्रकाशने याची साक्ष देतील

साहित्य प्रकाशनाच्या कामी लेखकाना आर्थिक साह्य देण्याची योजनाहि परिषदेने आखली आहे. अशा पुरस्कृत प्रकाशनापैकी श्री.राम पिंगळीकर याचा प्रस्तुत 'साद' हा कवितासग्रह हे दुसरे प्रकाशन आहे. श्री तु. श. कुळकर्णी याचा लघुकथासग्रह हा या पूर्वी याच योजनेतून प्रकाशित करण्यात आला आहे. अधिक साहित्यिक या योजनेचा लाभ घेतील अशी अपेक्षा आहे

श्री. राम पिंगळीकर हे मराठवाड्यास अपरिचित नाहीत. त्याचा 'साद' हा कविता सग्रह-प्रकाशित करताना आम्हास

आनद वाटतो. या सग्रहास उस्मानिया विद्यापीठातील मराठी विभागाचे प्रमुख डॉ. ना. गो नादापूरकर यानी प्रस्तावना लिहून दिली आहे तसेच मुद्रणाच्या कामी प्रा. श्रीधरराव कुळकर्णी यानीहि बरेच परिश्रम घेतले आहेत.

प्रकाशनास सहकार्य करणाऱ्या सर्व साह्यकाचे आभार !

— प्रकाशक

# आत्मनिवेदन

माझा हा पहिला कविता सग्रह प्रसिद्ध होत आहे. यातील काही कविता बऱ्याच जुन्या आहेत. आशय, अभिव्यक्ति, अनुभवाची अपरिपक्वता, अनुकरणप्रवृत्ति इत्यादि दोषाची जाणीव मला आहे. तथापि मी कसा होतो आणि कसा झालो हे या कवितावरून स्पष्ट होईल

आधुनिक महिपति सतकवि श्री. दासगणू यांच्या रसाळ भाविक वाणीने गोदावरीच्या परिसरात अनेकाना स्फूर्ति आणि प्रेरणा दिली. मीहि त्याचाच अशत अनुग्रहित आहे. श्री. दे. ल महाजन यानी काव्यप्रवृत्तीचे रोपटे वाढविले प्रारभीची कविता याच मार्गदर्शनातून आणि वळणातून निर्माण झाली.

मराठवाड्यातील प्रथितयश साहित्यिक कै श्री. बी. रघुनाथ याच्या सानिध्यात माझी कविताप्रवृत्ति काहीशीं वेगळ्या रितीनेंच वाढू लागली श्री. बा ग. हरसूलकर आणि श्री. भालचद्र कहाळेकर याचा प्रेमळ सहवासहि याच काळात लाभला. जी काही कविता झाली ती या त्रयीच्या प्रोत्साहक व प्रेमळ सहवासातच !

माझ्या कवितेची जन्मकहाणी ही अशी. तिचे गुणरूप मी काय सागू ? ते वाचकानीं ठरवावयाचे.

मराठवाडा साहित्य परिषदेने माझी ''साद' ऐकली. गुरुवर्य डॉ. नारायणराव नादापूरकरानी प्रस्तावनेचे लेणे चढविले. माझ्या अनेक मित्रानी प्रकाशनासाठी श्रम घेतले प्रा. श्रीधरराव कुळकर्णी यानी मुद्रणाच्या कामी अनेक परिश्रम घेतले. या सर्वांचे आभार मानावे तेवढे थोडेच. !

—राम पिंगळीकर

# साद ऐकून

श्री. पिंगळीकरांची कविता नांदेडसारख्या ठिकाणी गोदा-वरीच्या सान्निध्यात आणि संत दासगणूंच्या सहवासात जनन पावली आणि वाढीस लागली. त्यांना बालपणापासूनच कविता करण्याचा नाद आहे. या संग्रहांत त्यांच्या कवितांचे दोन भाग पडलेले स्पष्टच दिसतात. पहिल्या पहिल्या कवितांतून वर्णनाचा हव्यास, अनुकरण आणि वाटेल त्या विषयावर कविता रचून विचार पद्यरूपाने मांडण्याची वृत्ति दिसते, तरि पण तेथेहि त्यांच्या प्रतिभेची आणि काव्याच्या उज्वळ भवितव्यतेची अल्पशी चुणूक दिसते. त्याहि कवितांतून शब्दांची जडण-घडण, नाद माधुरी आणि कल्पना-विलास या काव्य गुणांचे प्रत्यंतर येते. पण अर्थातच हा सारा प्रकार नवकवीच्या थाटाचा आहे.

'निरंकुशा कवयः' कवीला बंधन कोणाहि प्रकारचे नसते. अमुक विषयावर कविता कर आणि अमुक विषय वर्ज कर असे कोणीहि कवीस सांगू शकत नाही. त्याची काव्य-विषयाची निवड स्वेच्छानुकूल असते. जितकी ज्याची दृष्टि व्यापक असते, विचार उत्तुंग असतात, अवलोकन सूक्ष्म असते आणि सहानु-भूती सर्वंकष असते तितका त्याचा काव्य-विषयाचा व्याप मोठा असतो. प्रस्तुत संग्रहांत कविताच मुळात थोड्या आहेत, त्या-योगे कवीच्या काव्यविषयाची व्याप्ति पाहतां येत नाही. विषय

कोणताहि असला तरी त्याजशी एकात्मता पावून तो कवीच्या मनात प्रथम ठसला पाहिजे. त्याचे स्पष्ट बिब कवीच्या मनात प्रथम उमटले पाहिजे आणि नतर त्याची अनुकूल अभिव्यक्ति रसिकाना मोददायी झाली पाहिजे चर्वणेच्या योगाने रसरूप बनलेली कवीची मनोवृत्ती आत्मप्रकटीकरणाचा मनोज्ञ मार्ग निवडून मोठ्या उसळीने बाहेर पडते. पुष्कळ वेळा भावनाशील कवीच्या मनावर अनेक दृश्याचे ठसे उमटलेले असतात. यांनी त्याची वृत्ति गजबजून जाते पण त्या अनेकातून भावगम्य आणि भावरम्य कोणता याची निवड नीट होत नसल्यामुळे निश्चित काय सागायचे तेच कवीचे नीट ठरलेले नसते. ह्या योगानें व्याप मोठा दिसत असूनहि त्यात प्रसन्नता आणि प्रगाढता आढळत नाही.

श्री. पिगळीकराच्या मनात मर्यादितच का होत नाही, पण वर्ण्य-विषयाची स्पष्ट कल्पना असते, आणि ते तिची अभिव्यक्ति समजणाऱ्या भाषेत आणि आकलन होणाऱ्या कल्पनेने करतात. त्यायोगे त्याच्या कवितेत भावनेची सदिग्धता, कल्पनेची अस्फुटता, अर्थाची ओढाताण आणि शब्दाशी दडीमुडप हा भाग सहसा आढळत नाही. त्याच्या मनातील आशय सहज गुणगुणत कवनात अवतरतो आणि साध्या सुध्या कल्पकतेची किंचितशी कुसर रसिकाच्या अन्त:करणास इवलीशी गुदगुली करून पुढे चालू लागते. त्याच्या प्रथमच्या कविता असोत वा अलीकडील कविता असोत ज्यांच्यांत भावनात्मक विषय आहे. त्यात हा अनुभव प्रतीत होतो.

विषय सुदर असून अनुभव सखोल असला तरी तो रसिक-जनसवेद्य होण्यासाठी प्रगटीकरणास विशेष महत्व असते. माडणीचे आकर्षण मोठे चमत्कारिक असते. पुष्कळदा आपण पाहतो की वस्तु साधारणच असतात, पण त्याची माडणी अशा मोहक पद्धतीने केलेली असते की कळत नकळत ती दृष्टीस वेधून घेते आणि प्रेक्षक क्षणैक का होईना तेथे घोटाळतोच. काव्य-प्राताताहि असेच आहे कवीच्या मनातील काव्य विषय बाहेर येताना अथवा कवीने तो लोकापुढे माडताना रसिकाचे आपणाकडे लक्ष आकृष्ट होईल ह्याची व्यवस्था केली असते ती त्याच्या नावात असते, कवितेच्या शीर्षकात असते. नावात काय आहे म्हणून कसे चालेल? नावात भाव असतो भावाकर्षण असते नावाने व्यक्ति ओळखू येते नि नावानेच कवितेनील आशयाची कल्पना येते. प्रस्तुत सग्रहात शीर्षके निवडण्यात कवीने बरीच चतुराई दर्शविली आहे शीर्षकाच्या योगाने कवितेचाहि आरभ होतो आणि वाचक सरळच कवितेच्या अतर-गात शिरतो आकर्षक शीर्षका प्रमाणेच त्याने आपल्या भावनेची गुफणहि सुदर केली आहे. त्यायोगे कवितेचे उधाण व्यक्त होते. ह्या दृष्टीने **"वाट"** **"संगतीच ही मुळी विसंगत"** **"पाहिली तुझी आजवर वाट"**, **"रे, मागें वळुनी बघ पथिका"** **"साद"** **"माझी जीवनगाथा"** **"मला हवें तें मधुर तुझे स्मित"** **"असेंच जगणें असे आमुचे"** इ० कविता विशेष उल्लेखनीय

आहेत. ह्या कवितांचे आद्यन्त आकर्षक असून भावनांचा परिपोष उत्कृष्ट झाला आहे

व्यंजनाशक्ति हे उत्कृष्ट काव्याचे मुख्य गमक आहे. काव्य यावे आणि ते व्यंजनेच्या सामर्थ्याने व्यक्त व्हावे. संसारातहि उघड पसाऱ्यापेक्षा अर्धनिगूढ अर्धोन्मीलित अशी परिस्थिति विशेष लक्ष वेधते नि अधिक प्रिय असते. सूचकतेने व्यक्त केलेली भावना रसिकास अधिक संमत असते. रसासंबंधीहि साहित्यिक सांगतात की तोहि व्यंग्यार्थानेच व्यक्त व्हावा तोच विशेष आल्हाददायक असतो. प्रस्तुत संग्रहात हा सूचकतेचा गुण मोठ्या प्रमाणात आहे पुष्कळशा कवितांतून ही अर्थाभिव्यंजना असल्यामुळे त्या सुंदर वाटतात "नीरवतेचें लेवुन पैंजण", "उर्मिलेचे अश्रु" आणि "पाणवठा" ह्या कविता ह्या दृष्टीने मला विशेष उल्लेखनीय वाटतात

प्रस्तुत संग्रहात आणिकहि एक मोठा विशेष आढळतो. कवीमध्ये शब्दचित्रणाचे सामर्थ्य मोठ्या प्रमाणात आढळते. अल्पाक्षर असूनहि कवीची वाणी बह्वर्थक असावी तशीच ती अल्पाक्षर असूनहि व्यक्तीचे वा प्रसंगाचे वा भावनेचे संपूर्ण आणि सम्यक् दर्शन करविण्यास समर्थ असावी हे शब्दचित्रणाचे सामर्थ्य कवीच्या प्राथमिक कवितांतूनहि आढळते. ह्या शब्दचित्रणात त्याची भाषाहि नाद मधुर आहे. यासाठी पुढील उदाहरणे पहा.

"तू क्षणात गमसी दिव्य स्वर्गिची सुधा
अमरत्व मानवा देसी या वसुधेची सपदा"

जिचे चित्र काढावयाचे तिची ही रूपसपदा उन्मादक नसून अमृत-फलदायी आहे ("**चित्रकार असतो तर**") "**ही विधिची सार्थकता**" ह्या कवितेतील त्या सुदरीस पाहून निसर्ग सुद्धा कसा प्रमुदित झाला हे कवि पुढीलप्रमाणे वर्णन करतो

"सळसळली पाने बघ खळखळली जलमाला
कुहुकुहु करि कोकिला वसत कल्पुनी तुला"

यातील सळसळणे, खळखळणे आणि कुहुकुहु करणे ह्या शब्दामध्ये आनदापेक्षा आणिकहि भावना निसर्ग व्यक्त करतो असे वाटते. कारण अशा सुदरीस निर्माण करून 'विधिला' देखील आपली कला सार्थकी लागल्यासारखे वाटते.

"शापित यक्ष असा मी येथें
उगीच बघतो त्याच दिशेते
क्रूर नियति हासते आपणा पाहुनि या परि वचित विवळत"

विसगत जीवनातील व्यथित मनाचो ही तळमळ आहे. ह्या सूचक पण सम्यक् वर्णनाने हे चित्र मोठे मार्मिक वाटते. ह्यात भावनेची दाहकता, उत्कटता आणि परिणामकारकता टच भरली आहे. हा काव्यसग्रह जरी लहान असला तरी ह्यात

अशा पुष्कळच सुंदर नि भावनोत्कट शब्द चित्रणे आहेत. आपले जीवित कसे निरानन्द आणि निष्प्रभ आहे ह्याचे वर्णन कविने पुढील प्रमाणे केले आहे

"असेच जगणे असे आमुचे। आनंदहि पण असाच सगळा
प्रेतावरचा साज निरर्थक। पुष्प समजणे निर्माल्याला"

हे आमचे सामाजिक जीवन आहे आणि ते किती बेगडी आहे हे कवीने येथे अत्यंत समर्पकपणे सांगितले आहे. ही प्रियकरीण पहा. हिचा प्रियकर हिजकडे पहात नाही, तरी पण हिच्या प्रेमात खंड नाही ही आपली मनोव्यथा त्यास पुढील प्रमाणे परिसविते.

"पापणि खाली इथे दडविल्या! अश्रु सरी
ज्या तुला न दिसल्या। ओथबुनि त्या तिथे
थबकल्या। अंगाईचे गीत गाउनी जोजविली मी
विलापिका।"

एकपात्री कथानकातिल ही नायिका प्रियकराच्या उपेक्षेमुळे उमडून आलेल्या भावना नेत्राच्याच पापण्याखाली दाबून ठेवते अश्रूची ओथवून आलेली मेघमाला न पडता तेथेच थबकून राहते हे म्हणण्यात कवीने केवढे तरी औचित्य साधले आहे दुःखतिरेकाने अश्रुसुद्धा जणू जागच्या जागी गोठले आहेत पुढे याच जीवनावर विलापिकेची जी रूपकातिशयोक्ति केली

ती याहिपेक्षा भावदर्शी आहे. आणि त्यापुढे जेव्हा ती त्या विलापिकेस अंगाईगीत गाऊन निजविते असे कवि म्हणतो तेव्हा तर या भावनेची परिसीमा होते. कारुण्याकडे अपत्य-निर्विशेष दृष्टीने बघण्याचा निजवरील प्रसंग म्हणजे कारुण्याचे किती तरी विदारक चित्रण आहे. याने कारुण्यातील अगतिकता वृद्धिंगत झाली. कवीने हे भावनिर्भर चित्रण मोठ्या कौशल्याने केले असून अगदी परिमित शब्दात केले आहे.

गुणाच्या दृष्टीने प्रस्तुत संग्रहात दोष अल्प आहेत. यातील अर्ध्या निर्ध्या कविता विशीच्या आसपासच्या शालेय आयुष्यातील आहेत तेव्हा त्यात भाषाविषयक दोष असणे नवलाचे नाही कोठे वृत्त दोष, कोठे यतिभंग, कोठे व्याकरणाचा दोष, कोठे ऱ्हस्व दीर्घाची ओढाताण, कोठे एखाद्या शब्दाचा अर्थ न कळल्यामुळे झालेला अनुचित अर्थी उपयोग आणि एक दोन ठिकाणी उपमानोपमेयाचा लिंग विषयक दोष आणि क्रियापदाचा एक दोन स्थळी वचन दोष असे सौम्य स्वरूपाचे दोष यात आहेत. यातील काहीतर केवळ अलक्ष्यतेमुळे राहिले आहेत ते सहज काढता आले असते. पण कवितेवर हात फिरवावा कुणी आणि कसा? प्रतिभेच्या उन्मेषभरात एकदा जे लिहिले ते ब्रह्मवाक्य त्यात फिरवा फिरव आम्ही करणार नाही अशा भ्रामक समजुतीने असे दोष राहू नयेत. येथे तसे राहिले नसतील असे वाटते, कारण कवीच्या ठायी अशी

दुराग्रही पृत्ति निदान मला तरी आढळली नाही.

या उलट कविला गाण्याचे थोडे अग असल्यामुळे स्वत त्याच्या म्हणण्यात त्यास हे दोष दिसत नाहीत नि त्यामुळेच तीत गण, मात्रा, यति इत्यादि वृत्तिविषयक दोष तसेच राहून जातात कवितेच्या दृष्टीने माझ्यामते हा दोष आहे. कवीने कविता कोणत्याहि (योग्य) रागा-तालात म्हणावी पण करावी मात्र छद शास्त्राच्या नियमानुसार वरील सर्व दोष अक्षम्य नाहीत पण थेबे थेबे तळे साचे, याची जाणीव कवीने ठेवावी. ह्या सर्व दोषात मला एक दोष मात्र अक्षम्य वाटतो. भावना असो, कल्पना असो वा वर्णन असो, त्याला फार ताणू नये. विषयाची मर्यादा सपल्यानतर एक जरी अक्षर अधिक झाले तरी ते अनुचित आणि रसविघातक होते "उर्मिलेचे अश्रु" या कवितेत माझ्या मते चवथ्या कडव्यावर कविता सपते.

दृष्टिपथी सिहासन। ठेविलेस जरी सजवुन
परिचतुर्दशाब्द काल अनभिषिक्त राहिले ॥४॥

रामचद्रासमवेत वनवासास गेलेला लक्ष्मण १४ वर्षे ब्रह्मचारी नि उपवासी होता हे प्रसिद्धच आहे त्याची स्त्री ही 'उर्मिला' हीहि अर्थात्च विरहावस्थेंत होती. चवदा वर्षे तिला पति सहवास घडला नाही यास्तव तिच्या विरहव्यथेचे हे वर्णन येथेच सपते. यापुढील कडवे विनाकारण वाटते.

त्याचप्रमाणे "**पाणवठा**" ह्या नितांत रमणीय आणि सहज-सुन्दर अशा कवितेत कवीने दृक्संवेदना आणि ऐंद्रिय-संवेदना याना इतर कवितातल्या प्रमाणेच आवाहन केले आहे पण हिची जडण घडण काही निराळीच आहे येथे वर्ण्य-विषयाची कल्पना अधिक ताणली प्रत्येक अंगाचे कवितेत आलेच पाहिजे ह्या भ्रात कल्पनेमुळे असा दोष उत्पन्न होतो. हेच माझ्यामते ह्या संग्रहातील महत्वाचे दोष आहेत आणि ते आत्मपरीक्षणावाचून जाणारे नाहीत

एकदर प्रस्तुत 'साद' संग्रह लहानसाच असला तरी त्यातील अर्ध्याहून अधिक कविता भावमथर आहेत. त्यात उक्तिवैचित्र्याने प्रसगोचित, श्रृंगारिक, करुण आदि भावनाचे सांद्रसिंचन कवीने केले आहे त्यात भावना विलास आहे. कल्पनाविलास आहे, आणि अभिव्यक्तीची नव्हाळी आहे अनेक कवितात अर्थाभिव्यंजक पदाची पेरणी असून ती चित्ताला आनद देणारी आहे. पण त्याच्या सामाजिक विषमता दर्श-विणाऱ्या क्रातीचे आवाहन करणाऱ्या आणि इतरहि विषयावरील कविता तितक्याशा आल्हाददायक वाटल्या नाहीत. मला त्यात कवि कोठे फारसा आढळला नाही."**हा तर या दशकाचा मान**" म्हणून जसे कवीने एका कालाचे वैशिष्ठ्य दाखविले तीच गोष्ट त्या कविताची आहे. अशा कविता करण्याचा आजचा युगधर्मच आहे या समजुतीपेक्षा त्याच्यात विशेषसे काव्य नाही अधुन मधुन एखादी बऱ्यापैकी कल्पना आणि कुठे साधारण प्रतीचे शब्दचित्रण आहे एवढेच

एकदरीने विचार करता एवढे नि सशय सागता येते की पिगळीकराच्या काव्यात महत्वाचे सारे काव्यगुण आहेत सख्या अल्प आहे हे खरे, पण हा त्याचा पहिला सग्रह आहे. उत्तरोत्तर ते अशीच आणि हिजपेक्षाहि अधिक भावसपन्न काव्य रचना करतील ही आशा आहे

—नारायण नांदापूरकर

२३-१०-५५

# अनुक्रमणिका



| अनुक्रम | विषय | पान |
| --- | --- | --- |
| १८ | रे, मागें वळुनी बघ पथिका | ३३ |
| १९ | मला हवे ते मधुर तुझे स्मित | ३५ |
| २० | मधुमीलन | ३६ |
| २१ | विसगत सगति | ३९ |
| २२ | नीरवतेचे पैंजण | ४० |
| २३ | वाट | ४१ |
| २४ | पाहिली तुझी आजवर वाट | ४२ |
| २५ | चढ उतार हे जीवनातले | ४३ |
| २६ | मृत्यूस | ४४ |
| २७ | दुवा निखळला आज | ४८ |
| २८ | निर्मल विश्वनिर्माती | ४९ |
| २९ | पाणवठा | ५१ |
| ३० | वायुयान | ५२ |
| ३१ | पाचारण | ५३ |



# श्रीशारदा वंदन

तुझ्या मदिरा पातता बद व्हावे
मला पाहता का कृपाद्वार ते
असे कोणते याहुनी माऊली गे
जगी साच दुर्भाग्य आणीक ते

पथाते क्रमूनी अला शीण जो का
तुझ्या दर्शने पार जाईल ही
मनातील आशेस या बालकाची
निराशा तुवा काय केलीस ही

तुझ्या थाटल्या दिव्य दर्बारिची
कीर्ति ऐकून धावून आलो झणी
इथे पाहतो तो निराळेच आले
मला प्रत्यया, का उठे मन्मनी—

कितीएक ती वादळे आणि शका
भ्रमे विस्मये बावरे मन्मन
जरी रिक्तहस्ते मला पाठवीले
असे त्वद्ब्रिदा साच हे लाछन

जनी लभ्य ना जाहली मान्यता ती
दरिद्री म्हणूनीच धिकारिले
तुझ्या ठायिही तोच का भेद व्हावा
अशा जाणिवे मी मनी विव्हळे

भवार्कातपी तापला देह माझा
तयाची करी त्यातुनी मुक्तता
कृपेचे असू दे सदा छत्र माथी
जरी एवढी प्रार्थना ऐकता

जगी धन्य होईल मी साच माते
तुझ्या गायनी वदनी पूजनी
खरे सार सर्वस्व मज्जीविताचे
असे साठवीले तुझ्या चितनी

तुझ्या सोज्वला शात मुद्रेवरी
तेज सामावले कोटि सूर्यापरी
खुले दिव्य श्वेताबरे हेमकान्ती
विणा वाद्य ते शोभले त्वत्करी

मयूरारुढा पकजाक्षी महन्मगले सौख्यदात्री नमो शारदे
सुमदार माला तुला वाहिली ही तया माउली स्वीकरी तू मदें

# कालगतीची अशीच घाटी

अशा कितिकशा अनेक गोष्टी
स्मृती जयाची पुसट जाहली
मन श्चक्षुना दिसे चित्रपट
ओझरतासा गत कालाचा
आठव ज्याचा येतो ओठी

निर्धन गगनागणी टाकिला
प्राजक्ताचा सडाच केवळ
भासतसे तारका पुज ह्या
तोच देखिले थरावरी थर
काळचा कभिन्नशा मेघाचे
दाट होय काळोख शेवटी

उभारिले जे उच्च मनोरे
हवेत विरले झुळुके सरशी
उन्मळुनीया काही पडले
सुटता वादळ परिस्थितीचे
अवशेषहि ते रज कगासम

विलीन झाले विस्मृत्युदरी
कालगतीची अशीच धाटी

आवेगाचे भर ओसरले
आवेशाचे सर ओघळले
तरीहि येइ दिशा-दिशातुन
निनाद एकचि 'आशा' 'आशा'
धमन्या मधुनी पुन्हा उसळते
तारुण्याचे उष्ण रक्त ते
नवी प्रेरणा घेउन शेवी
सूप्त शक्तिना जाग्रत करते
नभा गवसणी घालण्याचिही
स्वप्न मालिका गुंफित बसते
नियतीचा बसताच तडाखा
विद्ध होउनी विव्हळत बसते
हतबल ठरले प्रयत्न सारे
कटुतम अनुभव पदरी येता
दिला मनाने निर्वाळा हा
अप्रिय कटु परि सत्य शेवटी
कालगतीची अशीच धाटी

# ही दाद कोणांप्रत ?

ज्याचे वीष ज्वलज्जहाल पसरे फूत्कारिता भोवती
ज्याच्या आगमने चराचर भये प्राणात ते पावती
क्रोधे आपटती फणा महिवरी दोन्ही जिभा काढिती
काळेकुट्ट भयाण सर्प जमले दशावया मत्प्रती

या देहाप्रति वेष्टिला स्वविळखा ना एकही सोडिले
मर्मस्थान रिते, तया कडकडा फोडूनिया टाकिले
वाहे शोणितस्त्रोत अस्खलित या मत्कंठनालातुनी
अंगी रोमन्रोमिं ते विष अता आकंठ ये दाटुनी

जाती आकळुनी सबध तनुच्या नाड्या नि ये मूर्छना
अंगाचा भडका उठे नच मला या सोसवे वेदना
मृत्यूच्या कुहरी पुरा गवसलो जो आज मी सर्वथा
आला मृत्यु समीपही परि न की तो संपवी या व्यथा

झाला काय असा प्रमाद मम या हातून हो एवढा
पापाचा भरला घडा म्हणुनिया की द्यावयाते धडा?
या देहा सारसावले म्हणुनि का कोट्यावधी सर्प हे
आहे शासन एवढें मजप्रती का लोक हो न्याय्य हे ?

खो खो हासति पाहुनी विकलशी माझी स्थिती हे जन
द्यावा दोष तया उचित ना ही साक्ष दे मन्मन
निर्दोषी नितबद्ध, मात्र उलटा दोषी फिरे मोकळा
न्यायाधिष्ठित देवताच वितरी का न्याय हा आधळा ?

 

सत्याऽसत्य कळावयास असणे आवश्य की जाग्रत
अत श्चक्षु सदैव, तेच मिटले ही दाद कोणाप्रत ?

# असेच जगणें असे आमुचें

फिकी वाटली विषारता ही
कटुता पचवुनि जीवनातली
अमोघ सत्वे सजीवनिची
दाहक गरलामधी निमाली

कालकूट पचवून जाहला
कंठ कुणाचा निळसर काळा
काळवंडली समाज – काया
विषप्रकारहि इथे निराळा

दग्ध जीवनी सुधा सिंचिता
उधाण येइल सुधेसही अन्
बाष्परूप होऊन सभोती
विषमय होतिल क्षणात तत्कण

विषमतेतले दग्ध रसायन
बाळकडू जीवनात बनले
नुरली आता खंत तयाची
अंगांगातुन जरि ते भिनले

शुने चघळिता अस्थि मजेने
नकळत शोणित ये दाढेतुन
तेच चाटिता गमे त्याजला
आनदाचे काहीसे क्षण

*     *

असेच जगणे असे आमुचे
आनदहि पण असाच सगळा
प्रेतावरचा साज निरर्थक
पुष्प समजणे निर्माल्याला ॥

# जुगार

मज बोल यापरी लावु नका
घेतले व्यसन हे लावुन का       ॥ धृ. ॥

भल्या बुऱ्याचा कीस पाडुनी
अजवरि गेले मन हे विटुनी
गुरफटलो या जुगार व्यसनी
नच विफल दवडिल्या पळ घटका

खेळ खेळता पडती फासे
सारे उलटे जग मज हासे
तरीहि खेळत मी उल्हासे
कुणि स्तुती करो वा कुणि टीका

मिळेल मजला समाधान ही
शिवली नच कल्पना स्वप्निही
लोटिलि जाणिव असतानाही
साहसार्णवी ही मम नौका

अध पतित मी जगदृष्टीने
जरि झालो या दुर्व्यसनाने

यातुन येता अपेश मरणे
नशिबाचा म्हणतिल मज फुटका

दूषण देती आप्त मित्र मज
म्हणती फसले भोळे सावज
पाहू जाता गोळा बेरिज
ही अटक बरी, नलगे सुटका

# माझी जीवनगाथा

माझी जीवन गाथा
मला न माहित कसा कोठला कोण हिचा निर्माता ।।धृ।।
भग्नाऽशेची अभगावली
दिसेल पाना गणिक विखुरली
न कळत परि त्यातुनी गाइली
जीवन-सूक्ते, जरी त्यात नच छद नियम वा लयनिबद्धता
एकलेच हे फिरे व्यथित मन
कुठे मिळे का सहसवेदन
अणू-अणूचा शोधी कण कण
त्या निश्वासी छद जनन घे आणि तोच उद्गाता
गधरगरसविहीन पत्री
जमवुनि निर्माल्यहि एकत्री
अनुस्यूत या जीवन-सूत्री
श्रान्त क्लान्त होऊन करी मन पूजेची ही पूर्व-सिद्धता
कुणीहि या अन् कुणीहि वाचा
ओलावा ना भावुकतेचा
प्रसाद-हीन नि शुष्क या ऋचा
स्वर माधुर्या विना गायिल्या आजवरी यातल्या सहिता

# मी चित्रकार असतों तर!

लाजती तुला पाहून मनी वनलता
मृदुलता तुझ्या देहाची सरलता तशी चारुता
पद तुझा पडे चालता नर्तिकेपरी
नूपुरावीण रव येई मजूळ कोठुनी तरी
तू क्षणात गमसी दिव्य स्वर्गिची सुधा
अमरत्व मानवा देसी या वसुधेची सपदा
दुसऱ्याच क्षणी कल्पना येइ मानसी
घन कृष्ण तमी तळपावी ती वीज अबरी जशी
तव रसरसलेली अगकाति पाहुनी
हे यौवन भासे माते जणु जहरि चपल नागिणी
त्या सरळ नासिके मधिल खुले मोरणी
तत्तेज पडे गाली अन् स्पर्धेस ऊत ये क्षणी
ते ओठ नव्हत मधुचषक दोन ठेविले
का तहान गे शमवाया तृषितास विधीने भले
ना उपमा साजे तुला सुधेची इथें
ओसडुनिया मदिरौघ नेत्रातुन वाहे जिथें
ते तरारलेले नेत्र धुद कांहिसे

जणु भावसिंधु हेलावे लोचनीं तुझ्या राजसे

तव कटिचा किंचित वक्रभाग निरखिता

कल्पना चित्रकाराची ये चित्र न परि काढिता

हा फलक रिकामा तसा कुंचला रिता

साहित्य सज्ज प्रतिमेचे परि रेघ न ये ओढिता

मी उगीच कवि जाहलों असे वाटते

जें चित्र दिसे मजलागी ते कवनी ना बिंबते

# "ही विधिची सार्थकता"

शुभ्र विमल ज्योत्स्नायुत यामिनी दिसे जशी
रसरसली तनुतव नव यौवनी विलोलशी
वा कलाच काय इथे अवतरे तुझ्या मिषे
नुकले हे गूढ कुणा तूच साग राजसे!

नयनातिल नीलिमेत नील नलिनि जणु खुलली
अगकाति बघुन काय केतकीहि लाजली
सळसळली पाने बघ खळखळली जलमाला
कुहुकुहु करि कोकिला बसत कल्पुनी तुला

शृगाराविण न काव्य शृगार न तुजविना
शून्य गमे वसुधातल शून्य सकल भावना
आधिच आरक्त तुझे द्वय कपोल त्यावरी
गोड ठसा उठवुनि कुणि चाखिलि मधु माधुरी

लज्जेने आधिक दिसे टवटवीत रक्तिमा
अरुणाची सुषमा वा सुषमेची दीप्तिमा
नजर वा कटयार जहीर तीक्ष्ण पातिची तुवा
रोखुनिया मर्मस्थलि पाडिलास व्रणचि नवा

प्राविण्य हि मिळविलेस शरसधानी सहजी
स्मृति लवही बघता तुज नच राहे मज माझी
वर्तसि जरि नेणिवेत पुनित होय सर्वथा
नित नूतन नितविलोल नित नितात चारुता

वा कविची कल्पकता रसिकाची कल्पलता
नलिनीची नाजुकता पुष्पाची मोहकता
शूराची निर्भयता योग्याची निश्चलता
ज्योत्स्नेची शीतलता सरितेची चचलता

मुखि विलसे बालिशता वर्तनी विनम्रता
प्रमदेची कामुकता मदिरेची मादकता
आर्येची मगलता प्रतिभेची उज्वलता
मज गमते बघता तुज ही विधिची सार्थकता

# मार्गप्रतीक्षा

भराड पडलय उन इस्त्यावानी बाई
पोटाचीबी सुदबुद त्येना कशी न्हाइ

न्हाइ गेला घास त्येंच्या पोटामदी एक
लागलि असल काम करून लइ भूक
कासाइस करिते मी घरी येड्यावानी
तिथ व्हत असल रघताच पानी पानी

वावराच्या खाल्लाकुन रहीमाच घर
जाता येता करितो ग मेला कुरबूर
शिरप्याच्या लगीनाच्या येळी पाचईस
घेतले म्हनून खाइ शेत दहा बरस

खाउनीबी शेत, मागी महीन्याच याज
करजाच्या पाइ जाइ शेत तशी लाज
डोइला मुडासं नाही धड अगालाही
चिंध्या लागल्याती व्हइ अगाची ग लाही

घरधनी माझा भोळा जसा साबदेव
किती देले किती हृतं त्येला न्हाइ ठाव
नागरपचमीला गेल्या इरकली दोन
घेतल्या परि न लेल्या ठेवील्या जतन

ज्याच्या जीवावरी माझा खुले हा सिणगार
जीव हीरा सुखी न्हाइ मी तर ग गार
तुझ्या पाशी हाच कारे असा ब्येस न्याव
पिकवाव मालकान चोरान ते न्याव

काय काय लिव्हलय त्वा भोपळयात देवा
काही राहो परि बोल माझा तुझ्या नावा
वली सुकी देइ, आम्ही राजी तया मदी
कुकू पोत चुडा राहो माझा सुखी अदी

 

आला बाइ आझा जीव उपाशि तापाशी
उन कराया ग जाते गिळया शिता पाशी

# उर्मिलेचे अश्रू

उर्मिले, तुझेच काय अश्रु येथ साडले ।।धृ।।

विरहदग्ध जीवनात
निमिषमात्र ना उसत
तेज लोचनात अन् शरीर काळवडले

उगवला कसाहि दिवस
समसमान पुनव अवस
नेणिवेत गति-प्रधान कालचक्र फिरकले

ते न मुळी असु-सिचन
जणु हृदिचे आलेखन
अश्रुरूप घेति भाव अतरात दाटले

दृष्टिपथी सिहासन
ठेविलेस जरि सजवुन
परि चतुर्दशाब्द काल अनभिषिक्त राहिले

अश्रुसरी थाबु देत
करि न मुळी खेद खत
विधिने हे आधिच तव भालभागि रेखिले

## "हा तर या दशकाचा मान"

हा तर या दशकाचा मान
भुतावळी अविरोध घालिती इतस्तत थैमान

पाठ देउनी विश्वशांतिचा
अनभिषिक्त सम्राट हिंदचा
अखेर गाठी तळ शांतीचा
श्यामल कालिंदिच्या तटाकी ठेवुनिया प्रस्थान

हविर्भाग पडताच निमाले
यज्ञस्थंडिल धगधगलेले
यज्ञोत्तर या महीस घडले
लक्षावधि निष्पाप जिवाच्या रक्ते अवभृथस्नान

शांतिसूक्त उद्‌घोषुन अजवरि
समानतेची ऋचा वर वरी
गाउनि गाउन झिजे वैखरी
कृति परि करते धडावेगळी मानवतेची मान

दुरिताचे जावोत तिमिरघन
स्वधर्म सूर्याचे हो दर्शन
भरतवाक्य ते गेले बदलुन
पश्चिम जी सांगेल 'पूर्व' ती आम्हा आज प्रमाण

## दोस्तांची दर्पोक्ति

नव्या मनूचे नव्या युगाचे
युगप्रवर्तक लोक शाहिचे

इतिहासाची लिहिली पाने
निजरक्ताच्या लाल शाइने
पुटे चढविली अभिमानाने
नभा चुंबिले यशोध्वजाने

रणी शवाचा चढूनिया थर
स्वर्ग आणिला खाली भूवर
धरा थरकली एक क्षणभर
निनादले दिक्कोन नि अंबर

रणभेरी रव भिडतां गगनी
मोह शृंखला तटतट तोडुनि
हाकेला 'ओ' देता ज्या क्षणि
कित्येकाचे शाप तळतळुनि
माथी बसले प्रहार करुनी
कठोर वज्राच्या आघाताहुनी

ठिणग्या ठिणग्या क्षणी उडाल्या
प्रलयाग्नीचा डोंब उसळला
दाहक ज्वाला नभ पथाला
भिडल्या लाल कडा क्षितिजाला

पुराण नोहे नव्हेत गोष्टी
नव्हे काव्यमय कल्पित सृष्टी
समर-कुंड जणु चिता भयंकर
आहुति पडता त्यात भराभर
आकृति दिसल्या पिंगट धूसर
गर्जत उठले अखिल चराचर
"नव्हे दशक परि शतक गाजले"

नव्हे दशक परि शतक गाजलें
या विजये चैतन्य आणिले
जडातहि; ज्या जडत्व नुरले
कण कण ज्यातिल अंतःस्फुरले
प्रचंडौघ जो कधि न अडखळे
काळाच्या गतितेही दिपले—

लघुत्व ज्यांनी, आम्ही त्याचे
जनक गाजलों जगती साचे
नव्या मनूचे नव्या युगाचे
युगप्रवर्तक लोकशाहिचे

शास्त्र शस्त्र नी युद्ध कलाचे
पुनरूज्जीवन केले ज्याचे
ज्यात मिसळिले निज बुद्धिचे
तंत्र विशिष्टचि, नुमगायाचे–

कुणासही, परि केले अवगत
करणे सोपे गत वा अवगत
जगत्सूत्र अमुच्याने हालत
विजयोन्माद प्रतिक्षणि उसळत

यशार्णवाते पाहुन वाटत
सप्तसिंधु लोटांगण घालित
येइल हिमनग पद ठेचाळत
मान तुकविण्या जी गर्वोन्नत

वदतचि राहिल विश्व निरंतर
बघा प्रतीती हवी असे तर

हे दिग्दर्शक मानवतेचे
राष्ट्राचे त्यापरि जगताचे

नव्या मनूचे नव्या युगाचे
युगप्रवर्तक लोकशाहीचे

*            *

विश्वाच्या या विशालांगणी
नररक्ताचा सडा शिंपुनी
ऋतु-कंकण हें स्वकरी लेवुनि
नरमेघाची पुन्हा उजळणी
केली आजवर ज्या वृत्तींनी
मानवतेची का ही लेणीं

तुम्ही कोण हे पुसा तयांना
त्या अबलांना त्या मातांना
चटके बसले दु:सह ज्यांना
ठिकऱ्या हृदयाच्या उडतांना

पिळवटलेले तेंच आतडें
ओरडते पाडते हृदिं तडें
आकल्पातार्तस्वर त्याचा
घुमेल वातावरणी साचा
लक्ष लावुनी ऐका त्याचे
बोल रोकडे तुम्हां विषयिंचे

नव्या मनूचे नव्या युगाचे
युगविश्वंसक मानवतेचे

## पान उलटलें आज नवें

लिहिले जाइल या पानांवर
सुवाच्य सुन्दर वळीव अक्षर
निरक्षरहि जे वाचिल सत्वर
तुझ्या श्रमाचा प्रतिभेचा परिपाक समज नि शक कवे !

मानव्याचे व्याख्या-वैभव
शब्दकार ठरवितील अभिनव
भरास येइल प्रसन्नता नव
निष्ठुर निर्दय उलटे काळिज होइल याच क्षणिं हळवे

शुचितम सात्विक सरल भावना
श्वासोच्छ्वासा गणिक जयाना
तडे पाडले पुन्हा तयाना
सावण्यास या नव पानातिल शब्दच होतिल आज दुवे

गतकालातुनि जे जे उठले
साद, प्रतिसादे नभ भरले
आज तेच निःशब्द जाहले
सरसरुनी नच कधीहि येतिल नभःप्रांगणातुनि वळवे

नव क्षितिज अन् नव प्रभेचा
प्रतीत होइल प्रभाव त्याचा
साक्ष देइ इतिहास उद्याचा
विरल पावले विकलवृत्तिचे विकृतसे घनदाट थवे

रक्त–कलकित पान कालचे
स्मृत्यवशेषच राष्ट्रपित्याचे
क्षालन या पानी न तयाचे
युगायुगीच्या तप सिद्धि त्या उजळतील ते करतळवे

## बा! निर्दय काळा थांबव उदरंभरण

सपेल भयद ही काळोखाची रात
उगवेल प्राचिच्या क्षितिजावर डौलात
सुप्रभात, खगगण कलरव करतिल त्याच्या
सुस्वरासवे जग गाइल मगल गीत

उजळतील साऱ्या दाहि दिशाची वदने
उजळतील सारी मानव–अत करणे
त्या दिव्य उषेचे सुस्वागत करताना
मग सारे गातिल मानवतेचे गाणे–

हे अशा परीचे पसरुनी आशा जाल
कटु परिस्थितीचे पचवुनि जहर जहाल
पाहिले पुढें आशाळभूत नजरेने
देखिली भविष्याकृती अधिक विक्राळ

ही पाशविवृत्ती घालितसे थैमान
हैराण जाहला समाज; नुरले त्राण
ना उसत तिळभर अविरत मानवजात
स्वेच्छेच घेत हें जणू सतीचें वाण

स्वार्थांध होउनी सारी मानवजात
बिनदिक्कत चालवि सुऱ्या एकमेकात
हे लचके लचके तोडुन मानवतेचे
ना धडहि राहिले तिचे कलेवर येथ

कोसळती संकटराशी तीव्र रूपात
दशदिशा अवतणे देती बनुन भयभीत
अवतणे असो वा नसो अगातुकतेची
ना निसर्ग मानी यत्किंचित ही खत

कितिकाचे काळिज तुडवुन निर्दयतेने
हे कालचक्र गरगरा फिरे, निज गतिने
परिघात आपुल्या साठवुनी हे विश्व
विध्वस जगाचा करते तत्परतेने—

कोवळी अर्भके पडती मृत्यु—मुखात
उमलल्याहि ना ज्या कलिका ह्या वणव्यात
दग्धल्या, दिसे हा समाज तरु वठलेला
फल-पत्र-सुमाच्या आहुति देइ विरक्त

ही भूक लागली किती युगापासून
नच आला एकहि ढेंकर उदरामधुन
सारखे चालले घासामागुन घास
बा निर्दय काळा, थाबव उदरभरण

# तूंच घातिली साद

कुटीर जरि हे सान्निध्याने तुझ्या, गमत प्रासाद

ग्रीष्म शिशिर श्रावेण इतराना
थारा नव्हता म्हणुन मन्मना
गमल्या साऱ्या काव्य–कल्पना
जो न टाकिले पाऊल, चढला वासनिक उन्माद

वसतागमी डोळे लावुनि
आमराइ बहरेल म्हणो कुणि
खुळी कल्पना ठरेल स्वप्नी
वसत चौ भितीत याच मग, विफल जनाऽशावाद

निळ्या नभाचा माज उतरला
बघुन नीलिमा नयना मधला
नयनी ध्यानी मद दरवळला
पिक स्वनहि निज पार विसरले ऐकुन तव मधुनाद

दरिद्र्याची उसनी विभवे
थिटेपणा त्यातील जाणवे
तुझ्यामुळे हे हेवे दावे
शिरी घेतले सकळ जगाचे साहुनिया अपवाद

# भाऊबीज

कुणा आज भाऊराया ! ओवाळु या दिनी

आज भाऊबीज खरी
आनद तो घरो-घरी
परी दैव माझी करी–
तुझ्या वियोगाच्या योगे पुरी हेटाळणी

जाळितसे माझें मन
मजलागी रात्रदिन
बुझेल हा कैसा वण
जिथे होइ दु खाची या पुन्हा उजाळणी

माहेराचा साधा खण
मजवाटे जीव प्राण
त्याहुनिही मौल्यवान
वस्त्राच्या या राशी मज पोतेरी गाळणी

हृदयिच्या तबकात
तुझ्या स्मृतीची ही ज्योत
दिव्यतेने लखाटत
भावनेची निराजने गेली उजळोनी

द्वितीयेचा सुधाकर
न्याहाळून वारवार
पाहताच दाटे ऊर
तुझ्यामुळें आली त्याची लाळ घोटाळणी

नको चद्रम्या रागावू
नको दोष माते देऊ
आता तूच माझा भाऊ
बधु-भावनेची मज घाली ओवाळणी

# या दीपांनों होउन सुंदर!

या दीपानो! होउन सुदर
स्वप्नमयी ही अल्का नगरी
नटे घेउनी रम्य वेष जरि
मायावी पूतनाच दुसरी
काळोखातिल कालकूटमय स्तन्य पाजवी जगा भयकर

आजवरी जगशब्दा भुलले
सुखशातीचे स्वप्न फुलविले
त्यातच उठले अनेक इमले
कोसळलेल्या त्या इमल्याचा या जीवन-रूपात दिसे थर

'जमेचिना' अन 'पटेचिना' चे
वैषम्याचे नैराश्याचे
गीत सुरांवर एक्या वाचे
गातच बसले जुने पालुपद तथाकथित जे कुणी युगंधर

राजकारणी मुत्सध्यानी
नवसाहित्यिक तत्वज्ञांनी
खर्चि घातिली तपस्या कुणी
नवयुग निर्मिति आकांक्षा जी तिचेच का मग हे प्रत्यंतर

यत्र युगातिल परिणत जीवन
कुसस्कृतीच्या मुशीत ओतुन
काळवडुनी गेले; ' त्यातुन
आत्मतेज ते भास्वत्तेजे फुलवा घालुनिया नव फुकर

अजवरि होते युग हे निष्प्रभ
दिक्कालासह उजळा गिरिनभ
दरवळु ध्या परिसरात सौरभ
उष काळ नव यगिचा आणा दीपावलिनो ! पुढे-निरतर

# रे, मागें वळुनी बघ पथिका

रे, मागे वळुनी बघ पथिका ।।धृ।।

पदचिन्हांचा माग घेउनी
क्रमिला पथ मी तुझ्या मागुनी
शिणले दमले तरीहि अजुनी
नकळत मजला, वळते पाउल तुला पाहुनी अनामिका

कोण कसा तू मला न माहित
अनाहुतापरि आले धावत
घडले, घडते हे अनपेक्षित
मिळेल कैसी कलाटणी या एक-पात्रि मम कथानका

तव अनुकरणी मम सहचारण
घडते विपरित हे मद्वर्तन
करताना गुणदोष परीक्षण
युगमालेतिल दिनयामिनि मणि ओघळले जणु पळ घटिका

कसे कळावे तुज हृत्स्पदन
मूक मनाचे निगूढ गुजन

मृदु भावाचे सुख—सवेदन
वसत फुलतो चितनात परि जाणिव नच त्या शुकापिका

पापणिखाली इथे दडविल्या
अश्रुसरी ज्या तुला न दिसल्या
ओथबुनि त्या तिथे थबकल्या
अगाईचे गीत गाउनी जोजविली मी विलापिका

धूमिल धूसर वातावरणी
प्रकाश रेखा या सायतनि
काळोखाचे कवच फोडुनी
शत जिव्हानी चाटतील मज होउन दाहक अग्निशिखा

# मला हवें तें मधुर तुझें स्मित

मला हवे ते मधुर तुझे स्मित
उमडवून हृत्कोष विलसते, अस्फुट अधरी येउन तरळत

शरत्कालिच्या शशिची राका
पिउनी उठता मदिर शलाका
नितळ निरागस ओलेपणिच्या दवात हेलावे जे निथळत

नैराश्याचे दाट कृष्णघन
जमुनी झाकळता दृक्प्रागण
चपलेसम जे देत उजाळा चकाकुनीया क्षणात नकळत

स्मित हास्याचा निर्मल निर्झर
वाहत सथगतीने निर्भर
सौदर्यातुन तुझ्या लीलया मनोज्ञ सदर लय अनुकारित

मनोभाव नि शब्दतेतले
कळले अथवा नच आकळले
अनुक्त मन ते स्मितातुनी तव गुफविलेले उकली हृद्‌गत

शोधित आले निराश जीवन
तुझे तेवढे स्मित सजीवन
श्रान्त चेतना कणाकणाने गात्रामधुनी होई पुलकित

युगा-युगाची सुप्त अस्मिता
स्मिताप्रती तव ये जागविता
तुटलेली अतरेहि जुळती काजळलेले अतर उजळत

# मधुमीलन

सावरि ढळलेला

स्कंधिचा पदर आपुला गे !

उन्नत झालेल्या

यौवना फार जपावे गे !

सुडौल तव बाधा

फोडितो बांध सयमाचा

रोखुनिया दृष्टी

लाविता रोख कळे साचा

मानेवरि रुळतो

कुटिल कचभार स्निग्ध स्वैर

मद पवन गतिने

दरवळे सुगध चौफेर

मधु पाहुन भ्रमरा

निघे कां धीर लवहि सांग

दाविसि दुरुनीया

मधाचे बोट तरी कां ग ?

हसुनीया गाली

पाहसी खाली लज्जेने

हृद्‌गत नच कळते

त्यातला सकेत न जाणे

अर्ध अनावृतसे

शिल्प ते दिसे अरस्पानी

विकारवशता ये

तुला हे सागावे कोणी ?

दो भ्रुकुटी मध्ये

रेखिला तिलक कुकवाचा

सौदर्यी शोभा

वाढवी खळगा हनुवरचा

रदनावलि तव की

भासती कुंदकळ्या जेवी

अधर अमृताने

पुरित; हा तृर्षात रस सेवी

देह सौष्ठवाचा

गांठला विधिने उच्चाक

गलित गर्व होई

तुज पुढें शशांक निःशंक

पदन्यास बघता

नर्तिका मेनकाहि हरली

घेतलेस निमिषी

कंक ते विश्वामित्र बळी

पूर्णेंदू गगनी
विहरता भरती ये निधिला
त्याचपरी माझी
चंद्रिका तू या समयाला
शांत यामिनी ही
असे हे शांत विश्व आता
कंप सुटे अधरा
लागले स्फुरु पहा आता
श्वास ऊष्ण येई
पसरली लाली नेत्रात
खालीवर होती
उरोजद्वय निज क्षेत्रात—
वेगे श्वासाच्या
बंद ते तुटून बघ गेले
गुन्हेगार कैदी
दोन बंघ बंधमुक्त झाले

# विसंगत संगति

समातराने आपण दोघे क्रमितो जीवन-पथ रेगाळत ।।धृ।।

पथामधी अडखळून पडता
कुणासही नच ये सावरता
अनुल्लघ्य ही लक्ष्मण रेषा पहा आड ये समाज-निर्मित

क्षितिजा जवळी मनास भासे
पथ हे दोन्ही जुळल्या सरिसे
जाग्रतीत स्वप्नाचा प्रत्यय उभयतासही असा चाळवित

अपूर्त आकाक्षा कवटाळुन
जगवित आलो निर्जिव क्षण
गत स्मृतीचे धागे दोरे घेउन हाती बसलो जुळवित

शापित यक्ष असा मी येथें
उगिच बघतो त्याच दिशेते
क्रूर नियति हासते आपणा पाहुन यापरि वचित विव्हळत

# नीरवतेचें पैंजण

नीरवतेचें लेवुन पैंजण
रजतरसी घनतिमिर खलुनिया निशा लाविते नयनी अंजन

दिवसभराचा धागडधिंगा
तोच रात्रिचा प्रमादपिंगा
पुलकित गात्रातूत हिच्या ये अनंग मादक उसळत कणकण

नील गवाक्षातुनी चांदणे
तेजे हिसळत कणा कणाने
चराचरावर दृढतर हिममय या किमयेचे जणु संमोहन

शान्त निरामय निद्रावश जग
नसे उबग अन् नसेहि लगबग
धगधगत्या जणु स्थंडिलातले शीतल होउन पडलें इंधन

# वाट

पाथा वाट जाय तुडवून ।।धृ।।
जिच्यावरी तृणकणे विखुरली
वाताघाते धूळ पसरली
अस्तित्वाची अल्पहि न उरली
स्मृती, जिला नियतिने टाकिले विस्मृतीत दडवून

पदमुद्रा उमटताच तीवर
टवटवले दिसेल अंतर
जिला टाकिले वृथा आजवर
नैराश्याच्या ज्वलित धगीने करपुन अन् कढवून

क्रम नातल्यातून जन्मा या
शैशवातुनी यौवन उदया
चिरजीविता येइल काया
इप्सित स्थळी तुजला नेइल आज जरी हि नडून

शापित दुःखित अन् अवमानित
परित्यक्त अव्यक्त अनाकृत
कृतार्थ करण्या करि ही स्वीकृत
साकारी निज, तुझ्या पदाचा नवा साज चढवून

# पाहिली तुझी आजवर वाट

पाहिली तुझी आजवर वाट
प्रतीक्षेत तव, कळला ना दिन अथवा रात पहाट ॥धृ॥

मथर गतिने तुझे चालणे
म्हणून झाले नसेल येणे
इथे पसरली नैराश्याची वलये धूसर दाट

तुझ्याच निश्वासाची किमया
जगवि जागवी जीवनास या
मीलन लेणे सौभाग्याचे उजळवि अशुभ ललाट

भेटी साठी धाव धावती
दिवस-यामिनी युगा युगान्ती
क्रम नैसर्गिक असेल त्याचा, नच माझा परिपाठ

विरल जाहल्या नभ प्रागणी
साध्यरगि घनछटा पाहुनी
क्षितिजाचा ओलाडुनि येता शर्वरि अवघड घाट

# चढ उतार हे जीवनांतले

चढ उतार हे जीवनातले
अशाश्वतीच्या परिघा भोवति
सदैव हर्षामर्षाची युति
आशाऽकांक्षा ग्रह गोलतती
फेऱ्यातच हे मानवी जीवन असेच पडले धडपडले

संमोहित अन् साशंकित नित
अस्थिर आत्मे विस्मृतीत रत
जीवन चक्र वक्रगति अविरत
जया नियम न क्रमही परि ना एकदाहि जे अडखळले

शांत जलाशयि तरंग उठती
रविकिरणाची पडता दीप्ती
विविध रंग त्यातून झळकती
पवनाच्या झुळुकेत मात्र ते रंग तरंग तिथे विरले

बिकट विकट अन् कुटिल समस्या
उकलाया त्या गूढ रहस्या
थिटी पडे ती येथ तपस्या
अवसेची हो पुनव कधी अन पौर्णिमेस नभ काजळले

# मृत्यूस

भीती भयाने भयोत्पादका जै
तुझ्या पाहुनी उग्र रूपा जन
देवादिका दानवा मानवाना
पडे धाक होता तुझे दर्शन

ही भ्याडवृत्ती असे जन्मजात
प्रवृत्ती जिवाची तुझ्या कारणे
सर्पास पाहूनिया दर्दुराने
जसे अर्ध-मृत्यूस आलिंगिणे

कालस्वरूपात प्रत्यक्ष भासे
जिवा जो अही तोच टाकी फणा
येता नकूल स्वये झुजताना
करी जीवदानार्थ का याचना

या जीवमात्रास ना ज्ञान काही
कळेना असे मृत्यु हा कायसा
अज्ञान हे मूळ त्याच्या भयाचे
जरी मानिले, काय त्याची दशा?

काळा नको येउ आताच ऐसी
शिवे कल्पना मानवी मानसा
वाटे दरारा तुझा केवियोगे
जगाया कशासाठि ही लालसा

'आयू असे हे जगायास' ऐसी
विधाने कुणी सूज्ञ जे ठोकिती
काळा तुझ्या भीतिची साक्ष देती
विधानातुनी आपुल्या शेवटी

धात्यास ज्याने तपा आचरूनी
"न दे मृत्यु" ऐसा वरा याचिले
त्या क्रूर पूर्णप्रतापी जिवाला
तुवा आपुल्या कल्पने ग्रासिले

रत्नाकरा मथुनी अमृताचा
उपद्व्याप केला जयाच्यामुळे
संपादिले दानवी वैर नाकी
सुरानी तुझ्या फक्त भीतीमुळे

आला कुणालाहि ना टाळता जो
न येईल याही पुढे टाळता
ठावा तुझा कायदा हा जगाला
न कोणासही येइ उल्लंघित।

उत्तुग जी कीर्तिच्या वैभवाच्या
असे शैल माथाग्र आरूढली
सामावली केवढी विश्वव्यापी
विशालोदरी दिव्य राष्ट्रावली

उत्स्फूर्त ती चारुवाणी जयाची
तशी लेखणी ते कवी, ते जन,
हा सुष्ट नी दुष्ट हा सूज्ञ वेडा
तसा सत हा आणि हा दुर्जन

कामाध दु शासना सारखेही
तपस्वी कुणी भीष्म ग्रीष्मार्कही
ज्ञानार्क निवृत्ति-शिष्यापरीही
स्वयसिद्ध मत्स्येद्र गोरक्षही

केलीस ती मोजणी एक मापी
तयाची, मुळी भेद ना पाहिला
ह्या सर्व गोष्टी तुझ्या थोरवीची
पहा साक्ष देती कळे हे मला

मृत्युजयाच्या जपे वाढवीती
कुणी आपुल्या आयुचे ते क्षण
आहे क्रमप्राप्त हे आजला ना
उद्या भेट घेणे तुला लक्षुन

मृत्यूत ही जीव नाही कसा तो
सदा भेटसी अर्धमेल्यापरी
का भीति आम्ही तरी बाळगावी
तुझी एवढी व्यर्थ मातब्बरी

भ्यावे उगी निर्भिडा निर्दया का
तुला निर्भया निस्पृहा निर्गुणा
स्वीकारिले जन्म घेता क्षणी त्या
कृताता तुझ्या दिव्य आमत्रणा

# दुवा निखळला आज

दुवा निखळला आज
मराठवाड्यावरी पसरली भर माध्यान्ही साज ।।धृ।।

विझली आयुर्ज्योति निमिषी
कालवायुच्या झोतासरशी
पणती मधली स्नेहवात ती सपवि जीवित–काज

या नव–आघाताला सोसुन
मराठवाडा बघे चाचपुन
अपुले दुखरे हळवे काळिज कसे स्पदते आज

मराठवाडा फकीर दुबळा
प्रखर थडिने काकडलेला
काबळ त्याची पाघरील हा कल्पुन अक्षय साज

मराठिच्या या मानकऱ्याला
मराठि मुजरा करावयाला
नत मस्तक हे व्यक्तविण्यास्तव विमल प्रेम निर्व्याज

करा स्मारके भरा दुखवटे
सारे उसने नकलि मुखवटे
मेल्यावरती पिंड वदणे हा तर नित्य रिवाज

# निर्मल विश्व-निर्माती

निज कराल दाढा वासुनिया त्वेषात
रगडीत जीव चालली क्रुद्ध वेगात
जणु प्रलय भावना रोमरोमि संचरली
ज्यामुळे जाहले अखिल विश्व भयभीत

नेत्रातुन निघती तिच्या दाहक ज्वाला
चर्चिला रक्तसिंदूर भव्यतम भाला
विक्राळ गर्जना करी, आपटी श्रोत्रे
पिंजल्या जटा थयथया करी नृत्याला

ते शरीर काळेकभिन्न रुधिर स्त्रावे
न्हाऊन निघे जी चपलागतिने धावे
विश्वाचा करण्या घास पसरि दाभाड
नेईल कोणत्या थरा कुणा नच ठावे

खड्गादिक आयुधे रुधिराने भरलेली
विश्वाचे नरडे चरचर कापित सुटली
ही रुधिरप्रिय देवता नद्या रक्ताच्या
वाहून भागवी तृषा काढुनी जिभली

नरशिरे उधळि ही कदुकमम भवताली
आकठ प्राशुनी सुरामदं ही काली
प्रेनाचे तुडवी ढीग भेदिती नभ जे
पाचावर धारण अमराचीहि बसली

ही धिजयोन्मादे धुद धुद नेत्राने
जग पाही करि मग विकट हास्य क्रौर्याने
सहारकाड जे चालविले ते न सरे
अन्याय जोवरी राहे ताठरतेने

ती अजुनी धुदी तिच्या नाचते नयनी
तो क्रूर हास्यरव थरकवि नभ नी अवनी
डोलारा पाहे कोसळु ब्रह्माडाचा
हे विश्व-कलेवर जळते विश्व–स्मशानी

निर्माण व्हावया दुसरे निर्मल विश्व
या मलिन जगाचे निर्मूलन हे तत्त्व
जाणून अवश्यक म्हणुन कालिका धजली
की नरा द्यावया त्याचे नर–जीवित्व

# पाणवठा

पाणोथ्याची पायवाट
अवखळ मुलुखाची
नखरेल हिची चाल
कधी कधी गरतीची

नागमोडी ही वळणे
घेइ कधी गमतीचे
हिला लागले वळण
पाणवठ्याच्या पोरीचे

टवटवलेली दिसे
सकाळी नि सध्याकाळी
भर दुपारच्या वेळेला
दिसतसे कोमेजली

आसुसली ऐकण्यास
हिचे गूज तिचे गूज
साठवून मनी ठेवी
त्याचे सारे हित-गूज

# वायुयान

विहरे नभि आज इथे वायुयान एकटे

झेप उच उच घेत
दृष्टि आड होत जात
जेथुन विश्व प्रतीत एक सान रोपटे

नीलोज्वल नभ भाली
तीट लावण्या काळी—
वैमानिक काय धजे आज या पहाटे

आडविता मेघ-पुज
देइ तया थोर झुज
गमती जणु पद-पथिचे थोरले सराटे

बुद्धिशालि मानव हा
करित जणू आज स्पृहा
त्या अगम्य शक्तीची, काय यात खोटे ?

हिमगिरि हा ओलाडुनि
दृक्सीमा उल्लघुनि
काय अनतास मिळे सान्त याच वाटे

# पाचारण

रूप सपदा तुला लाभली अनुपमेय कां अशी
विधात्या भुरळ पडे तुज कशी
सौदर्या, वाटले असे का ह्रिच्याच रुपे तुते
सावयव होउन यावे इथे
कासारातिल कमलदलानो काय ह्रिच्या आगमे
लोपली प्रसन्नता मज गमे

हे अवखळ सरिते, चचलता तव कुठे
हे लतिके, वद मज नाजुकता तव कुठे
हास्य ते फुलानो तुमचे गेले कुठे

हास्य मृदुलता चचलता अन् प्रसन्नतेचा बरा
मनोहर मनोज्ञ सगम खरा
निटिलावरचे घर्मबिदु जणु भासति ऐशारिती
मौक्तिका निजतेजे ह्रिणविती
दोन बटा विस्कटून जाउन उडती वाऱ्यासवे
तयाचे सकेतहि ते नवे

साधेंच नेसले शुभ्रतलम पातळ
या पारदर्शि शरिरास खुले निर्मळ
चिरवेष्ठित ऐसे शिल्प दिसे उज्वल

सुसबद्धता विनयशीलता अमित मधुर भाषणी
गूण हे प्रकट होति तत्क्षणी

शालिनता तव वाढवि अनुपम सौदर्या आणखी
लाभता तू ज्या नर तो सुखी

हे जरी रेखिले शब्द-चित्र मी परी
अतिशयोक्तिचा नच लेशहि या भीतरी
घे ठाव हृदयिचा ओढ विचित्रहि खरी

हृत्पटलावर अक्षयिचे बघ चित्र तुझे उमटले
पुसावे कसे साग निर्मले

खुले हृदय एकदा करावे तुझ्यापुढे या परी
वाटले कितीकदा मज परी

शब्द जिभेवर उभे राहिले तिथेच विरले भयें
कळावे कसे मूक—अभिनये

ही कुचबणा मी साहु केंवि कुठवरी
नच असे शक्ति मम ठायि साह्यता करी
ही जीवनलतिका फुलेल या अवसरी

हृदयामधले दुखरे हळवे काळिज पाचारिते
तुला, अन् तुझी वाट पाहते